**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे मुळ गाव असलेले आंबडवे गावाच्या विकास कामाकरीता समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बैठक-२०१८/प्र.क्र.१०४ (भाग-२)/बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे मुळ गाव असलेले आंबडवे गावाच्या विकासाचा आढावा घेणेबाबत दि.६/६/२०१८ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत आंबडवे गावाच्या विकासासाठी विविध यंत्रणा/ विभाग यांच्या सहकार्याने व सहभागाने काम करणे आवश्यक असल्याचे दिसून आले आहे. परंतू सर्व यंत्रणांच्या कामामध्ये सुसूत्रता नसल्याने सचिव (सा.न्या. व वि.स.) यांच्या अध्यक्षतेखाली खालील सनियंत्रण समिती स्थापन करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे मुळ गाव असलेले आंबडवे गावाचा सर्वांगीण विकास व सदर ठिकाणी स्मारक आदी प्रकारची कामे प्रस्तावित असून त्यासाठी शासनाच्या विविध यंत्रणा/ विभागाचा सहभाग अनिवार्य आहे. सदर बाब विचारत घेऊन सदर विकास कामात सुसूत्रता व समन्वय यासाठी सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे सुकाणू सनियंत्रण समिती स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | मा. श्री. अमर साबळे, खासदार | सदस्य |
| ३ | जिल्हाधिकारी, रत्नागिरी | सदस्य |
| ४ | व्यवस्थापकीय संचालक, सिडको | प्रकल्प समन्वयक व प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा |
| ५ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |
| ६ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी | सदस्य |
| ७ | मुख्य कार्यकारी अधिकारी, मेरीटाईम बोर्ड | सदस्य |
| ८ | सहसचिव/उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

२. सदर स्मारकाचे बांधकाम सिडकोमार्फत करण्यात येईल यासाठी सिडकोला “प्रकल्प समन्वयक तथा प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा” म्हणून घोषित करण्यात येत आहे. सिडकोने सर्व संबंधित यंत्रणांशी समन्वय साधून याबाबत समितीस वेळोवेळी अवगत करावे.

**<u>प्रकल्प समन्वयक तथा प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा म्हणून सिडकोला खालीलप्रमाणे कामे करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे:-</u>**

अ) प्रकल्पाचे बांधकाम डिझाईन अँड बिल्ड (Design & Build) पध्दतीने पूर्ण करावे.

ब) प्रकल्पाचा Layout Plan व सर्व्हे/गट नकाशा यांची सांगड घालून प्रकल्पासाठी तथा भुसंपादीत करण्याचे सर्व्हे/गट नंबर तथा सीमा निर्धारीत करणे व भुसंपादनासाठी जिल्हाधिकारी रत्नागिरी यांना आवश्यक माहिती पुरविणे.

क) प्रकल्पासाठी आवश्यक असल्यास सल्लागाराची नेमणूक करणे.

ड) कामाची निविदा काढणे, त्याला प्रसिध्दी देणे, निविदा अंतिम करणे, संबंधित कंत्राटदार/एजन्सी ला कार्यारंभ आदेश देणे.

इ) कामाचे पूर्ण झालेल्या Stages नुसार टप्याटप्याने कंत्राटदार/एजन्सीचे देयके प्रदान करणे.

ई) प्रकल्पाचे प्रगतीचा वेळोवळी आढावा घेणे तसेच दर महिन्याला सुकाणू सनियंत्रण समितीला अहवाल देणे.

उ) प्रकल्प पूर्ण झाल्यावर महाराष्ट्र शासन सामाजिक न्याय विभागाला हस्तांतरीत करणे.

ऊ) प्रकल्प पूर्ण करण्यासाठी महाराष्ट्र शासन तथा सुकाणू सनियंत्रण समितीने वेळोवेळी दिलेले कामे.

प्रकल्पासाठी आवश्यक निधी सिडकोला महाराष्ट्र शासन सामाजिक न्याय विभाग मागणी क्र.एन-३, २२२५- अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण,७८९-अनुसूचित जाती घटक योजना, ०२- भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे ( योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशिर्ष २२२५ D८२३ या लेखाशिर्षामधून टप्याटप्याने उपलब्ध करण्यात येईल. याकरीता आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. यासाठी प्रथम टप्यासाठी आवश्यक निधीची मागणी सिडकोनी सामाजिक न्याय विभागास तात्काळ करावी. तसेच यानंतरच्या टप्यासाठी सिडकोनी सामाजिक न्याय विभागास वेळोवेळी निधीची मागणी करावी.

३. जिल्हाधिकारी रत्नागिरी हे स्थानिक पातळीवर प्रकल्पाचे कार्यान्वयात सहकार्य करतील व स्थानिक पातळीवरील प्रश्न सोडविण्यात मदत करतील. तसेच प्रकल्पासाठी भुसंपादन अधिकारी म्हणून काम पाहतील. तसेच प्रकल्पासाठी जागा मिळण्यासाठी तथा भुसंपादनाचे कामात येणाऱ्या अडीअडचणी सोडवतील.

**<u>या प्रकल्पासठी जिल्हाधिकारी रत्नागिरी यांना खालील कामे करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे:-</u>**

अ) प्रकल्पाचा लेआऊट नकाशा तथा सर्व्हे/ गट नकाशा याची सिडको चे मदतीने सांगड घालणे व प्रकल्पासाठी आवश्यक सर्व्हे नंबर/गट नंबर निश्चित करणे तथा प्रकल्पाचे सिमांकन निश्चित करणे.

ब) प्रकल्पासाठी भुसंपादनाने जागा महाराष्ट्र शासन सामाजिक न्याय विभागाला उपलब्ध करून देणे.

क) ज्या जागा दानपत्राव्दारे/संमतीपत्राव्दारे उपलब्ध करून घेणे शक्य आहे त्यासाठी संबंधीत जमीन मालकांशी वाटाघाटी/चर्चा करून अशा जागा प्रकल्पासाठी महाराष्ट्र शासन सामाजिक न्याय विभागाला उपलब्ध करून देणे.

ड) प्रकल्प कार्यान्वयात स्थानिक पातळीवरील अडीअडचणी/समस्या दूर करणे तथा प्रकल्प कार्यान्वयात सिडको तथा महाराष्ट्र शासनास मदत तथा सहकार्य करणे.

इ) सुकाणू सनियंत्रण समिती तथा महाराष्ट्र शासनाने वेळोवेळी दिलेले कामे/जबाबदाऱ्या.

भुसंपादनासाठी जिल्हाधिकारी रत्नागिरी यांना आवश्यक निधी महाराष्ट्र शासन सामाजिक न्याय विभाग मागणी क्र.एन-३, २२२५- अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९-अनुसूचित जाती घटक योजना, ०२- भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे ( योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशिर्ष २२२५ D८२३ या लेखाशिर्षामधून टप्याटप्याने उपलब्ध करून देण्यात येईल. याकरीता आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. भूसंपादनासाठी आवश्यक निधी जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी महाराष्ट्र शासन सामाजिक न्याय विभागाला टप्याटप्याने मागणी करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११२०१८०१२३७३२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.11.20 18:08:16 +05'30'

**( अ.कों.आहिरे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
३. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई

४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
५. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर
७. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे.
८. महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
९. मा. अमर साबळे, खासदार
१०.जिल्हाधिकारी, रत्नागिरी
११.व्यवस्थापकीय संचालक, सिडको
१२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
१३.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी
१४.मुख्य कार्यकारी अधिकारी मेरीटाईम बोर्ड
१५. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग,मुंबई
१६. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग,रत्नागिरी
१७. निवडनस्ती (बांधकामे).